GR 2004082716231200 1 - 0100

**शासकीय सेवेत असताना दिवंगत झालेल्या किंवा क्षयरोग, कर्करोग, यांसारख्या गंभीर आजारामुळे किंवा मानसिक किंवा शारीरिक विकृतीमुळे वैद्यकीय कारणास्तव अकाली सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकास अनुकंपा कारणास्तव शासकीय सेवेमध्ये नेमणूक देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय, क्रमांक अकंपा–१०८४/१८९/सीआर–१५५/तिरा–अ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ८ मार्च १९८५

**पहा.**—(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१०७६/बारा, दिनांक २३ एप्रिल १९७६.
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१०७६/बारा, दिनांक २१ जुलै १९७६.
(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१०७७/दहा–अ, दिनांक १ एप्रिल १९७७.
(४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१०७९/सीआर–२४३/१३–अ, दिनांक ५ ऑक्टोबर १९७९.
(५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१२८०/८५८/सीआर–३३/१३–अ, दिनांक १५ मे १९८०.
(६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१२८०/१९५८/१३–अ, दिनांक १३ मार्च १९८१.
(७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१२८१/४४३/१३–अ, दिनांक २४ मार्च १९८१.
(८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१२८१/सीआर-११४/१२३/१३–अ, दिनांक ७ सप्टेंबर १९८१.
(९) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही–१२८१/१४१६/सीआर-१५७/१३-अ, दिनांक २२ फेब्रुवारी १९८४.

**शासन निर्णय.**—१. शासन सेवेत असताना निधन पावलेल्या किंवा क्षयरोग, कर्करोग, इत्यादी दुर्धर रोगांमुळे किंवा मानसिक किंवा शारीरिक अपंगत्व आल्यामुळे वैद्यकीय कारणास्तव अकाली सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या जवळच्या एका नातेवाईकास अनुकंपा तत्त्वावर नोकरी देण्याची योजना उपरिनिर्दिष्ट आदेशानुसार शासनाने कार्यान्वित केली आहे. त्याचप्रमाणे शासन सेवेत असताना अपघाताने अपंगत्व आलेल्या कर्मचाऱ्याला त्याला पर्यायी काम करणे शक्य असताना सुद्धा, काम करण्याचे नाकारून ज्याने स्वेच्छेने सेवानिवृत्ती स्वीकारली आहे अशा कर्मचाऱ्याच्यासुद्धा नातेवाईकाला या योजनेचा फायदा देण्यात येतो. या योजनेची अंमलबजावणी करताना अशा काही अडचणी उद्‌भवतात की, ज्यामुळे त्याचा फायदा काही लोकांना घेणे शक्य होत नाही. याबाबतीत काळजीपूर्वक विचार करून व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाशी सल्लामसलत करून शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :—

(१) सध्याच्या नियमानुसार शासकीय कर्मचाऱ्याच्या नातेवाईकाने अनुकंपा तत्त्वावर नोकरी मिळण्यासाठी अर्ज करण्याची मुदत, सदर कर्मचाऱ्याचा मृत्यू/अकाली सेवानिवृत्तीपासून एक वर्षाच्या आत किंवा त्यावेळी संबंधित नातेवाईकाने आवश्यक ती शैक्षणिक पात्रता प्राप्त केली नसल्यास किंवा विहित निम्न वयोमर्यादा प्राप्त केली नसल्यास त्याने ती तीन वर्षांच्या आत प्राप्त करून त्यानंतर एक वर्षाच्या आत म्हणजे एकूण चार वर्षांच्या आत अर्ज करावा लागतो. आता असे ठरविण्यात येत आहे की, अनुकंपा कारणास्तव नोकरीसाठी संबंधित नातेवाईकाने करावयाचा अर्ज, शासकीय कर्मचारी दिवंगत/अकाली सेवानिवृत्त झाल्याच्या दिनांकापासून पाच वर्षांच्या आत करावयास पाहिजे. या पाच वर्षांच्या मुदतीमध्ये शैक्षणिक अर्हता प्राप्त करून अर्ज करण्यासाठी पूर्वीच्या तीन वर्षांच्या मुदतीचा देखील अंतर्भाव आहे.

(२) अनुकंपा तत्त्वावर संबंधित नातलगाची शैक्षणिक पात्रता व वय यानुसार राज्य शासनांतर्गत कोणत्याही तृतीय व चतुर्थ श्रेणीच्या, सरळ सेवा प्रवेशाने भरल्या जाणाऱ्या पदावर नियुक्ती करता येईल. **मात्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पोलीस उप निरीक्षक, विक्रीकर निरीक्षक, मोटार वाहन उप निरीक्षक, रेंज वन अधिकारी इत्यादी तृतीय श्रेणीच्या कार्यकारी (एक्झिक्युटीव्ह) पदावर नियुक्ती देता येणार नाही.** ह्या नियमांनुसार नियुक्ती मिळण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या स्पर्धा परीक्षेस बसण्याची आवश्यकता नाही. तसेच वरील नियमानुसार सदर पदावर नेमणूक करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सल्ला घेण्याची आवश्यकता नाही.

(३) रोजंदारी आस्थापनेवर नियुक्ती झालेल्या कर्मचाऱ्यांपैकी जे कर्मचारी कालेलकर करारानुसार ५ वर्षांनंतर रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर येतात व १० वर्षांच्या सेवेनंतर रुपांतरित स्थायी आस्थापनेवर येतात आणि ज्या कर्मचाऱ्यांना नियमित आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना लागू असणारे सर्व नियम लागू होतात अशा रुपांतरित आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकांना देखील या योजनेचा फायदा देण्यात येईल.

(४) अनुकंपा तत्वावर नोकरी देण्यास संबंधित नियुक्ती प्राधिकारी सक्षम आहेत. अशा नियुक्तीसाठी निवड समितीचा सल्ला घेण्याची आवश्यकता राहणार नाही.

(५) वरीलपैकी कोणताही नियम शिथिल करण्याची शक्ती शासनाकडे राहील. तथापि, अशा प्रकारे नियमांचे शिथिलीकरण करून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील वर्ग-३ च्या पदावर एखाद्या व्यक्तीची नियुक्ती करण्यापूर्वी आयोगाचा सल्ला घेतला पाहिजे आणि असा सल्ला घेण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाची पूर्वसंमती घेतली पाहिजे.

२. वरील परिच्छेद १ (२) मध्ये उल्लेख केलेल्या पदांपैकी पोलीस उप निरीक्षक, विक्रीकर निरीक्षक, मोटार वाहन उप निरीक्षक, रेंज वन अधिकारी इत्यादी तृतीय श्रेणीतील कार्यकारी (एक्झिक्युटीव्ह) पदांव्यतिरिक्त इतर पदांवर अनुकंपा तत्त्वावर करावयाच्या नियुक्त्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतून वगळण्यात आल्या आहेत. ह्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोग (विचार विनिमयापासून सूट) विनियम, १९६५ यामध्ये यथावकाश दुरुस्ती करण्यात येईल.

(शा.म.मु.) एच ३१७५ (७,५००–३-८५)

३. वर परिच्छेद १ व २ अन्वये सुधारणा करण्यात आलेले नियम लक्षात घेतल्यावर संपूर्ण नियमावली कशी असेल ती दर्शविणारे जोडपत्र सोबत जोडले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मुकुंद स. मोकाशी,**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई ४०० ०३५,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (१० जादा प्रतींसह),
*सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व हक्कदारी), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व हक्कदारी), नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-८,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-१२ व १४-अ,
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरुन),
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.

*पत्राने.

## जोडपत्र

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. अकंपा-१०८४/१८९/सीआर-१५५/तेरा-अ, दिनांक ८ मार्च १९८५ चे जोडपत्र.
(परिच्छेद ३ पहावा)

### अनुकंपा कारणास्तव शासकीय सेवेत नोकरी देण्याबाबतची सुधारित नियमावली

(१) महाराष्ट्र राज्य शासनाच्या सर्व कार्यालयांत अनुकंपा कारणास्तव करावयाच्या नेमणुकांना हे नियम लागू राहतील.

(२) खालील प्रकारांमध्ये मोडणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांचे (रूपांतरित स्थायी व अस्थायी आस्थापनेवरील कर्मचारी धरून) लगतचे नातेवाईक या नियमांनुसार अनुकंपा कारणास्तव शासकीय सेवेत नेमणुकीसाठी पात्र असतील :—

(अ) शासकीय सेवेत असताना दिवंगत झालेले कर्मचारी.

(ब) क्षय, कर्करोग इ. गंभीर आजारामुळे, सक्षम वैद्यकीय अधिकाऱ्याच्या प्रमाणपत्रानुसार अकाली निवृत्त झालेले कर्मचारी.

(क) (1) मानसिक किंवा शारीरिक विकलांगता आल्याने, सक्षम वैद्यकीय अधिकाऱ्याने पुढील सेवेसाठी अक्षम ठरविल्याने, अकाली निवृत्त करण्यात आलेले किंवा वरील कारणास्तव सेवेतून काढून टाकण्यात आलेले कर्मचारी.

(ड) (2) शासकीय सेवेत कर्तव्य बजावीत असताना अपघाताने अपंग झालेले परंतु महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ७२(३) अनुसार पर्यायी पद देऊ करूनही ते न स्वीकारता सेवानिवृत्ती स्वीकारणारे कर्मचारी.

(३) (अ) दिवंगत/अकाली निवृत्त शासकीय कर्मचाऱ्यांची विधवा/पत्नी, मुलगा किंवा अविवाहित मुलगी ही या नियमांनुसार नेमणुकीस पात्र नातेवाईक मानण्यात येतील. त्यापैकी कोणीही व्यक्ती नेमणूक स्वीकारू शकत नसल्यास सदर कर्मचाऱ्यावर अवलंबून असणारा अविवाहित भाऊ किंवा बहीण यांचा नेमणुकीसाठी विचार करता येईल.

(ब) सदर नेमणूक शासकीय कर्मचाऱ्यांच्या फक्त एकाच नातेवाईकास देता येईल.]

(४) (अ) (3) अनुकंपा तत्त्वावर संबंधित नातलगाची शैक्षणिक पात्रता व वय यानुसार राज्य शासनांतगत कोणत्याही तृतीय व चतुर्थ श्रेणीच्या सरळ सेवा प्रवेशाने भरल्या जाणाऱ्या पदावर नियुक्ती करता येईल. **मात्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पोलीस उप निरीक्षक, विक्रीकर निरीक्षक, मोटार वाहन उप-निरीक्षक व वन अधिकारी इत्यादी तृतीय श्रेणीच्या कार्यकारी (एक्झिक्युटीव्ह) पदांवर नियुक्ती देता येणार नाही.** ह्या नियमांनुसार नियुक्ती मिळण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या स्पर्धा परीक्षेस बसण्याची आवश्यकता नाही. तसेच वरील नियमानुसार सदर पदांवर नेमणूक करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सल्ला घेण्याची आवश्यकता नाही.

(ब) (4) संबंधित पदासाठी विहित शैक्षणिक पात्रता आणि निम्न वयोमर्यादा याबाबतच्या अटी या नेमणुकांसाठी कटाक्षाने पाळण्यात येतील. परंतु उच्च वयोमर्यादेची अट राहणार नाही.

(क) (5) तथापि, दिवंगत/अकाली निवृत्त कर्मचाऱ्याची विधवा/पत्नी, शैक्षणिक पात्रतेव्यतिरिक्त, इतर अटी पूर्ण करीत असल्यास तिच्या बाबतीत चतुर्थ श्रेणीत नेमणुकीसाठी शैक्षणिक पात्रतेची अट शिथिल करता येईल.

(५) (अ) अनुकंपा कारणास्तव नेमणुकीसाठीचा अर्ज शासकीय कर्मचारी दिवंगत/अकाली निवृत्त झालेल्या दिवसापासून ५ वर्षांचे मुदतीत करणे आवश्यक असेल.

'(ब) (6) दिवंगत/अकाली निवृत्त कर्मचारी ज्या कार्यालयात काम करीत होता, त्या कार्यालयातील संबंधित नियुक्ती प्राधिकारी या नियमानुसार नेमणूक देण्यास सक्षम राहील. त्यासाठी त्याने निवड समितीचा सल्ला घेणे आवश्यक नाही. मात्र नातेवाईकाने सदर प्राधिकाऱ्यांकडे उपरिनिर्दिष्ट मुदतीत नेमणुकीसाठी अर्ज करणे आवश्यक राहील.

---

(1) शा. नि. सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१२८१/४४३/१३अ, दिनांक २४ मार्च १९८१.

(2) शा. नि. सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१२८१/१४१६/सीआर-१५७/१३अ, दिनांक २२ फेब्रुवारी १९८४.]

(3) शा. नि. सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१०७६/१२, दिनांक २१ जुलै १९७६.

(4) शा. नि. सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१२८१/सीआर-११४/१२३/१३-अ, दिनांक ७ सप्टेंबर १९८१.

(5) शा. नि. सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१२८०/८५८/सीआर-३३/१३-अ, दिनांक १५ मे १९८०.

(6) शा. नि. सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१०७७/१०अ, दिनांक १ एप्रिल १९७७.

(६) (7) संबंधित कार्यालयात आवश्यक पद उपलब्ध नसेल तर कार्यालय प्रमुखाने त्या जिल्ह्यातील/विभागातील इतर कार्यालयाच्या नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे संपर्क साधावा व ज्या कार्यालयात आवश्यक पद उपलब्ध असेल त्या कार्यालयामध्ये नियुक्तीसाठी विचार करावा.

(७) खालील परिस्थितीत, दिवंगत/अकाली निवृत्त कर्मचाऱ्याचा कोणीही नातेवाईक या नियमातील तरतुदींनुसार नोकरीस पात्र राहणार नाही.

(अ) (8) सरकारी कर्ज, सहकारी संस्था, बँका इत्यादींचे देणे, यांसारखी वैयक्तिक देणी वजा करता भविष्यनिर्वाह निधी मृत्यु-नि-सेवानिवृत्ती उपदान, आयुर्विमा वगैरेद्वारे संबंधित दिवंगत/सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या कुटुंबास मिळालेली एकूण रक्कम रु. ७५,००० पेक्षा जास्त असल्यास,

किंवा

(ब) कुटुंब निवृत्तीवेतन (महागाई भत्ता धरून) व स्थावर मालमत्तेच्या उत्पन्नासह सर्व मार्गांनी मिळणारे कुटुंबाचे एकूण मासिक उत्पन्न रुपये ५०० पेक्षा जास्त असल्यास,

किंवा

(क) कुटुंबातील कमीत कमी एका व्यक्तीचे मासिक उत्पन्न रुपये ५०० पेक्षा जास्त असल्यास,

टीप.—"कुटुंब" या संज्ञेमध्ये दिवंगत/अकाली निवृत्त कर्मचाऱ्याची पत्नी, त्यांचे मुलगे, अविवाहित मुली व त्यांचेवर अवलंबून असलेले अविवाहित भाऊ व बहिणी यांचा समावेश होतो.

(८) (अ) वरीलपैकी कोणताही नियम शिथिल करण्याची शक्ती शासनाकडे राहील.

(ब) वरील नियम ४ (अ) मध्ये काहीही असले तरी वरील नियम ८ (अ) मधील तरतुदींद्वारे नियमांचे शिथिलीकरण करून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील वर्ग-३ च्या पदावर एखाद्या व्यक्तीची नियुक्ती करण्यापूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सल्ला घेतला पाहिजे आणि असा सल्ला घेण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाची पूर्वसंमती घेतली पाहिजे.

---

(7) शा. नि. सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१२८०/१९५८/१३अ, दिनांक १३ मार्च १९८१.

(8) शा. नि., सा., प्र. वि. क्र. एसआरव्ही-१९७६/१२, दिनांक २३ एप्रिल १९७६ अन्वये रु. ३०,००० व रु. ३०० वरून शा. नि., सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१०७९/सीआर-२४३/१३अ, दिनांक ५ ऑक्टोबर १९७९ अन्वये रु. ४५,००० व रु, ५०० करण्यात आली व शा. नि., सा. प्र. वि. क्र. एसआरव्ही-१२८१/सीआर-११४/१२३/१३अ, दिनांक ७ सप्टेंबर १९८१ अन्वये रु. ७५,००० करण्यात आली.